महाराष्ट्र - कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ....

**वित्तीय वर्ष २०२०-२०२१ मधील सप्टेंबर, २०२० ते नोव्हेंबर, २०२० या ३ महिन्यांकरिता अनुदानाचे वाटप.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : बियुडी-१८२०/प्र.क्र.२१/२०२०/३६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०२०

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१/०४/२०१५.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.७३/२०२०/२५, दि.२०/०४/२०२०
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थसंकल्प-३, दि.१६/०४/२०२०.
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८१९/प्र.क्र.२१/२०२०९/३६, दि.२२/०६/२०२० व. दि.११/०९/२०२०

**शासन परिपत्रक :-**

" **मागणी क्र.ए-५, २२३५** - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृती वेतन - (००) (०३) महाराष्ट्र कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्ती वेतन **(२२३५ २४९३)** " या लेखाशीर्षाअंतर्गत प्रत्येकी रु.१०,०००/- दरमहा निवृत्तीवेतन, रु.५००/- प्रवासखर्च व रु.५,०००/-इतर अनुषंगिक लाभ अदा करण्यासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी **एकूण रु.१७,५७,०००/- (रुपये सतरा लक्ष सत्तावन्न हजार फक्त)** एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यापैकी **पहिल्या तीन महिन्यांसाठी (एप्रिल ते जून, २०२०) रू.४,३९,२५०/-** व **जुलै व ऑगस्ट या महिन्याचे निवृत्तीवेतन** वितरीत करण्यासाठी **रु.३,५१,४००/-** असे एकूण **रु.७,९०,६५०/-** प्राप्त झालेल्या अनुदानापैकी या विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील अनुक्रमे दि. २२ जून, २०२० व दि. ११ सप्टेंबर, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये पाच महिन्याकरीता निवृत्तीवेतन, प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अदा करण्यासाठी एकूण रु.७,७७,००० एवढे अनुदान संबधित जिल्हाधिकारी यांना पुढील परिच्छेद क्र.२ मधील तक्त्यातील रकाना क्र. **४ व ५ मध्ये** नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यात आले आहे.

२. आता, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील **सप्टेंबर ते नोव्हेंबर या तीन महिन्याचे निवृत्तीवेतन** अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वर एकूण **रु.३,६५,०५०/-** इतके अनुदान उपलब्ध झाले आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत **एकूण १४ लाभार्थ्यांना दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी** प्रमाणे **निवृत्तीवेतन** अदा करण्यासाठी **सप्टेंबर ते नोव्हेंबर, २०२० या तीन महिन्याच्या** कालावधीसाठी एकूण **रु.३,६५,०००/- (रुपये तीन लाख पासष्ठ हजार फक्त)** चे अनुदान संबधित जिल्हाधिकारी यांना पुढील **तक्त्यातील रकाना क्र.६** मध्ये नमूद केल्यानुसार वितरीत करण्यात येत आहे.

| अ.. क्र. | जिल्हाधिकारी कार्यालयाचे नाव (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१९-२०२० एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | एप्रिल, २०२० ते जून ,२०२० साठी उपलब्ध तरतूदीतून निवृत्तीवेतन व प्रवास भत्ता करीता वितरीत केलेले एकूण अनुदान (रुपये) | जुलै व ऑगस्ट, २०२० या दोन महिन्यासाठी निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ करीता वितरीत केलेले एकूण अनुदान (रुपये) | माहे सप्टेंबर ते नोव्हेंबर, २०२० या तीन महिन्यासाठी निवृत्तीवेतन (दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी ) एकूण वितरीत अनुदान (रुपये) | एप्रिल ते नोव्हेंबर, २०२० या महिन्याकरिता एकूण वितरीत अनुदान (४+५+६) (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | |
| १ | मुंबई शहर (३) | -- | ९१,५०० | ७५,००० | **७५,०००** | २४१,,५०० |
| २ | कोल्हापूर (९) | -- | २,७४,५०० | २,२५,००० | **२,३०,०००** | ७,२९,५०० |
| ३ | पुणे (१) | -- | ३०,५०० | २५,००० | **३०,०००** | ८५,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | -- | ३०,५०० | २५,००० | **३०,०००** | ८५,५०० |
| एकूण अनुदान | | **१७,५७,०००** | ४,२७,००० | **३,५०,०००** | **३,६५,०००** | **११,४२,०००** |

३. **सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-**

१) **एप्रिल २०२० ते नोव्हेंबर, २०२०** या महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतुदीइतका मर्यादित ठेवावा.

२) **संबंधित** जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनासदेखील पाठवावी. कुठल्याही परिस्थितीत **"२२३५२४९३"** या लेखाशीर्षाखालीच या रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

४. हे परिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक, क्रमांक **बीयुडी-२०२०/प्र.क्र.७३/२०२०/२५, दि.२०/०४/२०२०** व वित्त विभागाचे परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थसंकल्प-३, दि.१६/०४/२०२०. मधील सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०१११२१८१०२५५९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY KRISHNA BHOSALE

Digitally signed by SANJAY KRISHNA BHOSALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=68fad25d7626a3cc798a2cdee2480a108e46d2bc3c24f98d38cc78723fe79c0f, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c549c327e75e99b0c2f6bb87a090e6975ac22558478e66be40c818fd3d8e3726, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY KRISHNA BHOSALE
Date: 2020.11.12 18:13:38 +05'30'

**( सं. कृ. भोसले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**<u>प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-</u>**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र- १, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
४. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
७. जिल्हाधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
८. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१२. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (कार्या.३६).